राज्यात माहे डिसेंबर, २०१९- जानेवारी, २०२० या कालावधीत झालेल्या गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी बाधित शेतकऱ्यांना मदत वाटप करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०२०/प्र.क्र.४/म-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ ऑगस्ट, २०२०

वाचा : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.०५.२०१५
२) आयुक्त (कृषी) यांचे पत्र क्र. कृआ/विप्र-१/नैसआ/प्र.क्र ४/गारपीट/४६८१/२०२०, दिनांक ४.२.२०२०

**प्रस्तावना:-**

राज्यात माहे डिसेंबर २०१९- जानेवारी, २०२० या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निर्दशनास आले होते. त्यामुळे शेतीपिकांच्या नुकसानीचे पंचनामे करून राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषानुसार व दरानुसार बाधित शेतकऱ्याना मदत देण्यासाठी आवश्यक असलेल्या मदतीचा तपशील कृषी आयुक्तांमार्फत पाठविण्याच्या सुचना शासन पत्र दिनांक ३.१.२०२० अन्वये देण्यात आलेल्या होत्या. सदर सुचनानुसार संयुक्त पंचनामे झाल्यानंतर ३३ टक्के पेक्षा जास्त नुकसान झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषानुसार व दरानुसार मदत देण्यासाठी आवश्यक असलेल्या मदतीचा प्रस्ताव कृषी आयुक्तांकडून संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक १३.३.२०२० रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहे डिसेंबर २०१९- जानेवारी ,२०२० या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाल्याने बाधित शेतकऱ्यांना मदत वाटप करण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार एकूण रू. ९३५८.०० लक्ष ( रूपये त्र्याण्णव कोटी अठ्ठावन्न लक्ष फक्त ) इतका निधी विभागीय आयुक्तांमार्फत वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. शेतीपिके व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालील दक्षता घेण्यात यावी :

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) बाधित शेतकऱ्यांच्या बँक खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

iv) कोणत्याही बाधित शेतकऱ्यास रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत देवू नये.

v) मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

३. उपरोक्तप्रमाणे बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण रू ९३५८.०० लक्ष ( रूपये त्र्याण्णव कोटी अठ्ठावन्न लक्ष फक्त) इतका निधी मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत,३१ सहाय्यक अनुदाने (२२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. कार्यासन म-११ यांनी सदर निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्तांमार्फत वितरीत करावा.

४. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. लाभार्थ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी रक्कम आहरित करून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १७६/२०२०/व्यय-९, दिनांक १७.०८.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८२६१२२१५२४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.08.26 12:33:12 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई
२. सचिव (कृषी), मंत्रालय,मुंबई,
३. विभागीय आयुक्त, अमरावती/नाशिक/नागपूर
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. जिल्हाधिकारी, जळगांव/अमरावती/यवतमाळ/वाशिम/वर्धा/नागपूर/भंडारा
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

७. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव/अमरावती/यवतमाळ/वाशिम/वर्धा/नागपूर/भंडारा
१०. सह सचिव व वित्तिय सल्लागार (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
११. कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती म-३ कार्यासन.

**शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक- सीएलएस २०२०/प्र.क्र. ४ /म-३ ,**
**दिनांक: २६ ऑगस्ट, २०२० चे विवरणपत्र "अ "**

| अ.क्र | विभाग | जिल्हा | बाधित क्षेत्र (हे.) | वितरीत करण्यात येत असलेला निधी (रू लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | | जळगांव | ६१६ | १११.०० |
| | **एकूण नाशिक विभाग** | | **६१६** | **१११.००** |
| २ | | अमरावती | ६८१७६ | ६६७७.०० |
| ३ | | यवतमाळ | २१८ | २०.०० |
| ४ | | वाशिम | ६०० | ८१.०० |
| | **एकूण अमरावती विभाग** | | **६८९९४** | **६७७८.००** |
| ५ | | वर्धा | ११२१२ | ८१९.०० |
| ६ | | नागपूर | १६९८६ | १६२९.०० |
| ७ | | भंडारा | २७३ | २१.०० |
| | **एकूण नागपूर विभाग** | | **२८४७१** | **२४६९.००** |
| **एकूण राज्य** | | | **९८०८१** | **९३५८.००** |